**सहायकांच्या कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नतीसाठी व सरळसेवेने नियुक्त झालेल्या कक्ष अधिकाऱ्यांसाठी सन २०११ मध्ये घ्यावयाची विभागीय परीक्षा.**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक : परीक्षा-१२११/प्र.क्र.१७/२०११/१७,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- १ ऑक्टोबर, २०११

पहा :- १) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग,परिपत्रक क्रमांक : सेप्रप्र-१२११/प्र.क्र.१७/२०११(१)/१७, दि. ३० जून, २०११.
२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग,परिपत्रक क्रमांक : सेप्रप्र-१२११/प्र.क्र.१७/२०११(२)/१७, दि. ३० जून, २०११.
३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग,परिपत्रक क्रमांक : सेप्रप्र-१२११/प्र.क्र.१७/२०११/१७, दि. २० ऑगस्ट, २०११.

**परिपत्रक**

मंत्रालयीन प्रशासकीय विभागातील सरळसेवेने नियुक्त झालेल्या कक्ष अधिकाऱ्यांची सन २०११ मधील विभागीय परीक्षा आणि मंत्रालयीन विभाग व महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे कार्यालय यामधील पात्र सहायकांची कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नतीसाठी घेण्यात येणारी सन २०११ मधील परीक्षा, नोव्हेंबर/डिसेंबर, २०११ मध्ये घेण्यात येणार आहे. त्या परीक्षेचे स्थळ, वेळापत्रक, उमेदवारांचे बैठक क्रमांक इ. तपशीलवार कार्यक्रम नंतर जाहीर करण्यात येईल. त्यानुषंगाने पूर्वतयारी करण्याच्या दृष्टीने, यापूर्वी घेण्यात आलेल्या परीक्षेमध्ये अनुत्तीर्ण झालेल्या किंवा अनुपस्थित राहिलेल्या उमेदवारांचे अर्ज, तसेच सन २०११ मधील परीक्षेस प्रशिक्षणाशिवाय बसू इच्छिणाऱ्या पात्र कक्ष अधिकारी / सहायक यांचे विहित नमुन्यातील अर्ज, आपल्या विभागामार्फत या विभागाकडे निश्चितपणे **दिनांक १५ ऑक्टोबर, २०११ पर्यंत** पाठविण्याची कृपया व्यवस्था करण्यात यावी.

२. परीक्षेस बसू इच्छिणारे उमेदवार सदर परीक्षेची उत्तरपत्रिका मराठी किंवा इंग्रजी यापैकी कोणत्या माध्यमातून लिहिणार आहेत याची माहिती कृपया संबंधित उमेदवारांकडून घेवून त्याबाबत या विभागास अवगत करण्यात यावे.

३. सर्व मंत्रालयीन विभाग व सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग यांना विनंती करण्यात येते की, सदर परिपत्रक सर्व संबंधित अधिकारी / कर्मचारी (प्रतिनियुक्तीवर/रजेवर असलेल्या उमेदवारांसह) यांच्या त्वरित निदर्शनास आणण्यात यावे. एखादया पात्र उमेदवाराचा अर्ज, या विभागाकडे, आपल्या विभागाकडून पाठविण्यास कसूर झाल्यास, त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधीत विभागाची राहील याची कृपया नोंद घेण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अ. द. जोशी

**( अ. द. जोशी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
सह/उप सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना),
निवड नस्ती.